**विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे आदर्श औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये दर्जावाढ करणे या योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र हिस्सा २२३०ए७३७ व राज्य हिस्सा २२३०ए७२८ या लेखाशिर्षांतर्गत निधी ३१ सहायक अनुदाने या उदिष्टांतर्गत निधी पुनर्वितरणाव्दारे खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पुरक-२०२२/प्र.क्र. १३१/व्यशि-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२३

संदर्भ :- १) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-३३१५/प्र.क्र.१६/व्यशि-३ दिनांक १३ जुलै, २०२१

२) केंद्र शासनाचे कौशल्य मंत्रालयाचे पत्र क्र. No.DGT-35(4)Model ITI/Nashik/2015-NPIU दिनांक- ०४.०१.२०१६

३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे क्र.१२/नियोजन/आऔप्रसं/पुर्नविनियोजन/२०२२-२३/प्र.क्र.१२/१७ दिनांक :- १६.०१.२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत- विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थाचा आदर्श औद्योगिक प्रशिक्षण दर्जावाढ करणे ही योजना औद्योगिक प्रशिक्षण संस्था, सातपूर जि. नाशिक या संस्थेस राबविण्यास संदर्भ क्र. १ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना ही ७० टक्के केंद्र हिस्सा व ३० टक्के राज्य हिस्सा आहे. संदर्भ क्र. २ अन्वये केंद्र शासनाव्दारे ७० टक्के हिश्यापैकी १५७.३३ लाख निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी हा तीन घटकांमध्ये विभाजित करण्यात आलेला आहे. सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती या घटकांतर्गत निधीचे विभाजन करण्यात आलेले आहे. संदर्भ क्र. ३ अन्वये संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या व्दारे सर्वसाधारण घटकांतर्गत ३१ सहायक अनुदाने या उदिष्टांतर्गत निधीची पुनर्विनियोजन करण्याबाबत मागणी करण्यात आलेली आहे. सदर प्रस्तावाची पुरक मागणी हिवाळी अधिवेशन २०२२ मध्ये सादर करण्यात आली असता त्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. सदर योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत- विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थाचा आदर्श औद्योगिक प्रशिक्षण दर्जावाढ करणे ही योजना औद्योगिक प्रशिक्षण संस्था, सातपूर नाशिक या संस्थेत राबविण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. या योजनेंतर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत निधी केंद्र हिस्सा २२३०ए७३७ व राज्य हिस्सा २२३०ए७२८ या लेखाशिर्षांतर्गत निधी ३१ सहायक अनुदाने या उदिष्टांतर्गत निधी

पुनर्विनियोजनाव्दारे केंद्र शासनाव्दारे वितरीत निधी रु. १५७.३३ लक्ष पैकी सर्वसाधारण घटकांतर्गत रु. १२५.८६ निधी सर्वसाधारण घटकाकरीता वितरीत करण्यात आलेला आहे. त्यापैकी केंद्र हिस्सा ८८.१० लक्ष व राज्य हिस्सा रु. ३७.७६ लक्ष असा एकूण रु. १२५.८६ लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

केंद्र शासनाच्या वितरीत रु. १२५.८६ लक्ष वितरीत निधीपैकी केंद्र हिस्सा उर्वरित निधी रु. ३७.५६ व त्यानुसार राज्य हिश्याचा रु. १६.०९ असा एकूण रु. ५३.६५ लक्ष निधी ३१ सहायक अनुदाने या उदिष्टांतर्गत पुनर्वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९७/व्यय-६ दिनांक २७.०३.२०२३ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१२४९४२१८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANGEETA AJIT SHINDE

Digitally signed by SANGEETA AJIT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ba607066e7a34e428b7c7c73de0f7e09a315a2af5075fd47f1e08389aa137b81, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DDF4C16E4A3043BBAA409E4ECF901CA0490CE93C66913DE88A7769927FF5E261, cn=SANGEETA AJIT SHINDE
Date: 2023.03.29 12:54:37 +05'30'

**( संगीता शिंदे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी
२. सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग ,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. सह सचिव/उप सचिव, कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग,मंत्रालय, मुंबई
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय नाशिक, पूणे, नागपूर
८. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, नाशिक, पूणे, नागपूर
९. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी नाशिक,पूणे, नागपूर
१०. प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक,पूणे, नागपूर
११. निवडनस्ती.